**तुळजाई प्रतिष्ठाण बहुउद्देशीय संस्था संचलीत स्वआधार मतिमंद मुलींचे बालगृह, उस्मानाबाद हे बालगृह विमानतळ रोड, आळणी, ता.जि.उस्मानाबाद येथे स्थलांतर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र. इडीडी २०१७/प्र.क्र.५२/अ.क.१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २५ जानेवारी, २०१९ .

<u>वाचा -</u> १) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांचे पत्र क्रमांक अकआ/प्र-४ मति/तुळजाई/बालगृह/स्थलांतर/उस्मानाबाद/२०१ ८-१९/४७५५, दिनांक १६.८.२०१८.

२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इडीडी-२०१७/प्र.क्र.६/अ.क.१, दि.१६.९.२०१७.

<u>प्रस्तावना</u> :-

तुळजाई प्रतिष्ठाण बहुउद्देशीय संस्था संचलीत स्वआधार मतिमंद मुलींचे बालगृह, उस्मानाबाद या बालगृहाचे नोंदणी प्रमाणपत्र क्रमांक अे-९९४, दि.१५.६.२०१३ आहे. सदर बालगृह सध्या भाडयाच्या इमारतीमध्ये चालविण्यात येत आहे. तुळजाई प्रतिष्ठाण बहुउद्देशीय संस्था संचलीत स्वआधार मतिमंद मुलींचे बालगृह, उस्मानाबाद या संस्थेने शासन निर्णय दि.१६.९.२०१७ नुसार सर्व सोई सुविधायुक्त इमारत विमानतळ रोड, आळणी, ता.जि.उस्मानाबाद येथे बांधली असल्यामुळे सदरचे मतीमंद मुलींचे बालगृह स्थलांतरणास परवानगी मिळणेबाबतचा प्रस्ताव जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, उस्मानाबाद तसेच आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी शासनाकडे शिफारशीसह पाठविला होता. त्यानुषंगाने तुळजाई प्रतिष्ठाण बहुउद्देशीय संस्था संचलीत स्वआधार मतिमंद मुलींचे बालगृह, उस्मानाबाद हे बालगृह विमानतळ रोड, आळणी, ता.जि.उस्मानाबाद येथे स्थलांतर करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

तुळजाई प्रतिष्ठाण बहुउद्देशीय संस्था संचलीत स्वआधार मतिमंद मुलींचे बालगृह, उस्मानाबाद हे बालगृह विमानतळ रोड, आळणी, ता.जि.उस्मानाबाद येथे स्थलांतर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे .

२. सदर संस्थेला अपंग/विशेष शाळा मान्यता व अनुदान या योजनेचे अस्तित्वात असलेले नियम व वेळोवेळी अस्तित्वात येणारे नियम बंधनकारक राहतील.

३. सदरहू बालगृहाचा स्थलांतरणाचा सर्व खर्च संबंधीत संस्थेला करावा लागेल. त्याची प्रतिपूर्ती देय असणार नाही.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१९०२०२१५१०३०२६२२ असा आहे .हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=Dnyandev Laxman Sul
Date: 2019.02.02 15:11:59 +05'30'

**( ज्ञा. ल. सुळ )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई ४०००३२.
२) प्रधान सचिव (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहायक, मुंबई ४०००३२.
३) आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, लातूर.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, उस्मानाबाद.
६) समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, उस्मानाबाद
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
८) जिल्हा कोषाधिकारी, उस्मानाबाद.
९) अध्यक्ष/सचिव, तुळजाई प्रतिष्ठाण बहुउद्देशीय संस्था संचलीत स्वआधार मतिमंद मुलींचे बालगृह, उस्मानाबाद.
१०) निवडनस्ती (अपंग कल्याण-१).